**महाराष्ट्र शासन**
**नियोजन विभाग**
**शासन आदेश क्र. रानिमं-२०१९/प्र.क्र.१२०/का.१४२६**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- ०४/०३/२०२०.

**आदेश :-**

श्री. सुंदर मदनराव जाधव, सह जिल्हा निबंधक व मुद्रांक जिल्हाधिकारी (वर्ग-१), कोल्हापूर यांच्या सेवा नियोजन विभागाच्या अधिपत्याखालील राज्य नियोजन मंडळ, मुंबई येथे "खाजगी सचिव" या पदावर प्रतिनियुक्तीने दिनांक १६/७/२०१९ (म.पू.) पासून पुढील आदेश होईपर्यंत खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून नियुक्ती करण्यात येत आहे.

अ) श्री. सुंदर मदनराव जाधव, सह जिल्हा निबंधक व मुद्रांक जिल्हाधिकारी (वर्ग-१), कोल्हापूर यांची "खाजगी सचिव" या पदावरील प्रतिनियुक्तीची सेवा समाप्त झाल्यानंतर प्रतिनियुक्तीच्या पदाचा कार्यभार सुपूर्द करून त्यांच्या मूळ विभागात ज्या तारखेला रुजू होतील त्या तारखेला त्यांच्या प्रतिनियुक्तीचा कालावधी समाप्त होईल.

आ) जर श्री. सुंदर मदनराव जाधव, सह जिल्हा निबंधक व मुद्रांक जिल्हाधिकारी (वर्ग-१), कोल्हापूर यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली, तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळेस त्यांना परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन/सक्षम प्राधिकारी यांना राहील.

इ) जर श्री. सुंदर मदनराव जाधव, सह जिल्हा निबंधक व मुद्रांक जिल्हाधिकारी (वर्ग-१), कोल्हापूर यांची सेवा स्वीयेत्तर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही, तर त्यांना मूळ विभागाकडे परत पाठविण्याची मुभा स्वीयेत्तर नियोक्त्याला राहील. मात्र, याप्रमाणे परत पाठविण्यापूर्वी स्वीयेत्तर नियोक्त्याने शासनाला / सक्षम प्राधिकाऱ्याला तीन महिने अगोदर सूचना दिली पाहिजे; आणि

ई) श्री. सुंदर मदनराव जाधव, सह जिल्हा निबंधक व मुद्रांक जिल्हाधिकारी (वर्ग-१), कोल्हापूर यांनी मूळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे याबाबतची लेखी सूचना कमीत कमी तीन महिने अगोदर शासनाला / सक्षम प्राधिकाऱ्याला दिल्यानंतर त्यांना मूळ विभागाकडे परत जाण्याची मूभा राहील.

२. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा इ.) नियम-१९८१ मधील नियम-४० (परिशिष्ट-दोन) मधील तरतुदी विचारात घेऊन श्री.सुंदर मदनराव जाधव, सह जिल्हा निबंधक व मुद्रांक जिल्हाधिकारी (वर्ग-१), कोल्हापूर यांच्या "खाजगी सचिव, राज्य नियोजन मंडळ" या पदावरील प्रतिनियुक्तीबाबतच्या अटी व शर्ती स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येतील.

३. श्री.सुंदर मदनराव जाधव, सह जिल्हा निबंधक व मुद्रांक जिल्हाधिकारी (वर्ग-१), कोल्हापूर यांच्या इतर सर्व प्रशासकीय बाबी नियोजन विभाग आणि महसूल व वन विभाग यांच्यामार्फत हाताळण्यात येतील.

४. श्री.सुंदर मदनराव जाधव, सह जिल्हा निबंधक व मुद्रांक जिल्हाधिकारी (वर्ग-१), कोल्हापूर यांना महसूल व वन विभागाने तात्काळ कार्यमुक्त करावे.

महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर सदर शासन आदेश उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक २०२००३०९१५४४२७६३१६ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

PRADNYA MAHALE

Digitally signed by PRADNYA MAHALE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=31c8683f52ccbefd97bce49983c4151d2caf1c185c657ea855ac85f31e5f681e, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=f0b9244e8f45f12e0a399cd036d6d3767c67c8349951e3e5047b7469a24cdfb2, ou=PLANNING DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=PRADNYA MAHALE
Date: 2020.03.09 15:47:48 +05'30'

**( प्रज्ञा महाले )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

श्री. सुंदर मदनराव जाधव,
सह जिल्हा निबंधक व मुद्रांक जिल्हाधिकारी (वर्ग-१),
कोल्हापूर.

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्री महोदय यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
२) मा. मंत्री (महसूल व वन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
३) मा. मंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
४) मा. राज्यमंत्री (नियोजन) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
५) मा. कार्यकारी अध्यक्ष (मंत्री दर्जा), राज्य नियोजन मंडळ, मुंबई.
६) अपर मुख्य सचिव (सेवा), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
७) अपर मुख्य सचिव, महसूल (महसूल नोंदणी व मुद्रांक शुल्क), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
८) निवडनस्ती.